वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/ जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट अ (कनिष्ठ) या संवर्गात पदोन्नती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन आदेश क्रमांकः मावज-२०१६/प्र.क्र.१७० (४) /३४-अ,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१७

**शासन आदेश :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील सहायक संचालक (माहिती)/ माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने, गट-ब ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४००) या संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकाऱ्यांना वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/ जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट अ (कनिष्ठ) ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ५००० या पदावर खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांची रकाना (४) येथे त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व वर्तमान पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण, महसूली विभाग व नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती अमरज्योत कौर अरोरा, निवासी व्यवस्थापक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, नवी दिल्ली (प्रतिनियुक्तीने कार्यरत) | खुला | जनसंपर्क अधिकारी, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली |

**अटी व शर्ती :-**

१) वरील अधिकाऱ्यांना वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/ जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट अ (कनिष्ठ) या पदावरील पदोन्नती ही तात्पुरती पदोन्नती असून ती मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक २७९७/२०१५ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती ही निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मिळणाऱ्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११९२४३६२००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2017.03.31 19:25:43 +05'30'

( रा. ना. मुसळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. संचालक (माहिती)(प्रशासन)/ (वृत्त व जनसंपर्क)/ (माध्यम समन्वयक), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
४. उपसंचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
५. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
६. संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई/ नवी दिल्ली,
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
९. संबंधित अधिकारी (मावज मार्फत),
१०. निवडनस्ती.